संसदीय कार्य विभागातील पदांचा सुधारीत
आकृतीबंध निश्चित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०१६/प्र.क्र.२७/पाच**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०६ एप्रिल, २०२२

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग क्रमांकः आस्थापना -२०१०/प्र.क्र.५/पाच, दि.२८.०२.२०१२
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः साप्रआ-१०१५/प्र.क्र.१०१४/१९, दि.८ जानेवारी, २०१६
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दि.११ फेब्रुवारी, २०१६
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः पदनि-०६१७/प्र.क्र.२०/आपुक-१, दि.२९ जून, २०१७
५) वित्त विभागाचे पृष्ठांकन क्र.पदनि-२०२१/प्र.क्र.५५/२१/आपुक, दि.२३.०९.२०२१ सोबतचे उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२६.०८.२०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :-**

संसदीय कार्य विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये या विभागासाठी एकूण ३७ पदे मंजूर आहेत. संदर्भ क्र.३ येथील दिनांक ११ फेब्रुवारी, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील मंजूर पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत. तसेच संदर्भ क्रमांक ४ येथील दिनांक २९ जून, २०१७ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यासाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २६.०८.२०२१ रोजी झालेल्या उच्च्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीत, संसदीय कार्य विभागातील एकूण ३७ पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्याचा प्रस्ताव विचारार्थ सादर करण्यात आला होता. सदरहू बैठकीचे इतिवृत्त संदर्भ क्र.५ येथील पृष्ठांकनासोबत विभागास प्राप्त झाले असून संसदीय कार्य विभागातील ३० नियमित + बाह्ययंत्रणेव्दारे घ्यावयाच्या एकूण ७ मनुष्यबळाच्या मर्यादेत बाह्ययंत्रणेच्या सेवा अशा सुधारीत

आकृतीबंधास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार संसदीय कार्य विभागातील पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सोबतच्या विवरणपत्र ‘ अ ’ व ‘ ब ’ मध्ये दर्शविल्याप्रमाणे, संसदीय कार्य विभागातील ३० नियमित पदे + बाह्ययंत्रणेव्दारे घ्यावयाच्या ७ मनुष्यबळाच्या सेवा या पदांच्या सुधारीत आकृतीबंधास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे. विवरणपत्र ‘ अ ’ मधील अनुक्रमांक १० ते १३ येथे दर्शविण्यात आलेली पदे मृत संवर्ग घोषित करण्यात येत आहेत. अनुक्रमांक १० ते १३ येथील मृत संवर्गात सध्या जेवढे कर्मचारी कार्यरत असतील तेवढी पदे अधिसंख्य समजण्यात यावीत. अधिसंख्य म्हणून ठरविण्यात आलेल्या पदावरील व्यक्तींच्या सेवानिवृत्ती किंवा अन्य कारणामुळे ते पद रिक्त झाल्यनंतर सदरचे पद रद्द होईल. विवरणपत्र ‘ब’ मध्ये दर्शविल्याप्रमाणे ७ मनुष्यबळ संखेच्या मर्यादेत बाह्ययंत्रणेव्दारे सेवा घेण्यास मान्यता देण्यात येत आहे. सध्या अधिसंख्य म्हणून कार्यरत असलेली पदे वगळून उर्वरित मनुष्यबळाच्या सेवा बाह्ययंत्रणेकडून घेण्यात याव्यात.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भाधीन अ.क्र.५ येथील पृष्ठांकनान्वये प्राप्त झालेल्या इतिवृत्तामध्ये नमूद केलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४९/आपुक, दि. २९.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४०६१५३९४८३७१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAMESH SAKHARAM SARFARE

Digitally signed by RAMESH SAKHARAM SARFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PARLIAMENTARY AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=52e560d0b76dfea3392e26761deeb6b2efc5f1bea42c0dffdc1d69d316ae65a8, pseudonym=862A58221F8149B3F046D77C70F284E32E9BBEBC, serialNumber=0C7001609C3EF1F1A1774B5223846FB28E7BF476529C879E1FD04746BFA60FD7, cn=RAMESH SAKHARAM SARFARE
Date: 2022.04.06 15:43:02 +05'30'

**( र. स. सरफरे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई

३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई
४. मा.मंत्री (संसदीय कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा.राज्यमंत्री, संसदीय कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
६. अपर मुख्य सचिव, (सेवा,)/सा.प्र.वि.), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
८. सह सचिव,मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय,मुंबई,
९. अवर सचिव वित्त विभाग (आपुक-१/विसु-१/व्यय-४/सेवा-९) मंत्रालय,मुंबई
१०.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई
११.महालेखापाल-१ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई
१२.सचिव, संसदीय कार्य यांचे स्वीय सहायक, संसदीय कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१३.उप सचिव, संसदीय कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१४.अवर सचिव, संसदीय कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१५.सर्व कक्ष अधिकारी, संसदीय कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१६.निवडनस्ती.

**शासन निर्णय,संसदीय कार्य विभाग क्र.आस्था-२०१६/प्र.क्र.२७/पाच, दि. ०६ एप्रिल, २०२२**
**सोबतचे विवरणपत्र**
**"विवरणपत्र - अ"**

**नियमित पदे-३०**

| अ. क्र. | पदनाम | वेतनस्तर (रुपये) | प्रचलीत आकृतीबंधानुसार मंजूर पदे | उच्चस्तरीय सचिव समितीने सुधारीत आकृतीबंधानुसार मंजूर केलेली पदे |
|---|---|---|---|---|
| १ | सचिव | संवर्ग पद | १ | ०१ |
| २ | सह सचिव<br>उप सचिव | एस-२७ (११८५००-२१४१००)<br>एस-२५ (७८८००-२०९२००) | ०१ | ०१ |
| ३ | अवर सचिव | एस-२३ (६७७००-२०८७००) | ०१ | ०१ |
| ४ | कक्ष अधिकारी | एस-२० (५६१००-१७७५००)<br>(४ वर्षाच्या नियमित सेवेनंतर)<br>एस-१७ (४७६००-१५११००) | ०५ | ०५ |
| ५ | उच्चश्रेणी लघुलेखक | एस-१५ (४१८००-१३२३००) | ०२ | ०२ |
| ६ | सहायक कक्ष अधिकारी | एस-१४ (३८६००-१२२८००) | ०८ | ०८ |
| ७ | लिपिक-टंकलेखक | एस-६ (१९९००-६३२००) | १० | १० |
| ८ | रोखपाल | एस-६ (१९९००-६३२००) | ०१ | ०१ |
| ९ | देयक लेखापाल | एस-६ (१९९००-६३२००) | ०१ | ०१ |
| १० | नाईक | एस-३ (१६६००-५२४००) | ०१ | मृत संवर्ग |
| ११ | रोनिओ ऑपरेटर | एस-३ (१६६००-५२४००) | ०१ | मृत संवर्ग |
| १२ | झेरॉक्स ऑपरेटर | एस-३ (१६६००-५२४००) | ०१ | मृत संवर्ग |
| १३ | शिपाई | एस-१ (१५०००-४७६००) | ०४ | मृत संवर्ग |
| | **एकूण** | | **३७** | **३० नियमित पदे** |

अ.क्र.१० ते १३ येथील मृत संवर्गात सध्या जेवढे कर्मचारी कार्यरत असतील तेवढी पदे अधिसंख्य समजण्यात यावीत. अधिसंख्य म्हणून ठरविण्यात आलेल्या पदावरील व्यक्तींच्या सेवानिवृत्ती किंवा अन्य कारणामुळे ते पद रिक्त झाल्यानंतर सदर पद रद्द होईल.

**विवरणपत्र "ब"**

**बाह्यंत्रणेव्दारे घ्यावयाच्या सेवा - ७ पदे**

| अ.क्र. | सेवा | मनुष्यबळ संख्या |
|---|---|---|
| १ | शिपाई | ०७ |
| **एकूण** | | **०७** |

अधिसंख्य म्हणून कार्यरत असलेली पदे वगळून उर्वरित मनुष्यबळाच्या सेवा बाह्ययंत्रणेकडून घेण्यात याव्यात.